श्री शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे येथे टेबल टेनिस हॉल मधिल "वुडन फ्लोअरींग" या कामासाठी रु.२,८५,६७,५३४/- इतका निधी वितरीत करणेबाबत- लेखाशिर्ष (२२०४-१७०२).

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण- ३०२४/ प्र.क्र. ४१/क्रीयुसे-१,

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
तारीख: २८ /३/२०२४

**वाचा :-**

१.शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. क्रीडायो-३४१२/प्र.क्र ५४/क्रीयुसे-१,दि. २४/५/२०१३
२.शासन निर्णय,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,क्र.राक्रीधो२०२३/प्र.क्र.२३/क्रीयुसे-१,दि.१४/२/२०२३
३.आयुक्त,क्रीडा व युवक सेवा,पुणे यांचे क्र.शिछक्रीसं/वुडनफ्लोअरींग/२०२३/का-११/१४३५, दि.२९/११/२०२३
४.शासन पत्र क्रमांक बैठक २०२३ /प्र.क्र.८३/क्रीयुसे-१, दि.२९/१/२०२४
५. शासन निर्णय,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. संकिर्ण ३०२४/प्र.क्र४१/क्रीयुसे-१,दि.१२/२/२०२४.

**प्रस्तावना :-**

शिवछत्रपती क्रीडा संकुल, बालेवाडी पुणे येथे विविध स्पर्धा, प्रशिक्षण शिबीर, क्रीडा प्रवोधिनी प्रशिक्षणार्थीचा दैनंदिन सराव यासाठी क्रीडा सुविधा योग्य मानकानुसार असणे क्रमप्राप्त आहे. सदर क्रीडा संकुलात आंतरराष्ट्रीय -राष्ट्रीय-राज्य दर्जाच्या टेबल टेनिसच्या विविध स्पर्धा आयोजन होत असून या स्पर्धासाठी विहित मानकानुसार वुडन फ्लोअरींग असणे आवश्यक आहे. सदर क्रीडा संकुलातील टेबल टेनिस हॉल मधील वुडन प्लोअरींग सन २००७ मध्ये बसविले असून त्यास १६ वर्षाचा कालावधी होऊन गेला आहे. त्यामूळे सदर वुडन प्लोअरींग बदलणे आवश्यक आहे. शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे मधील टेबल टेनिस हॉल मधील वुडन फ्लोअरींग बदलण्याच्या कामास संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णय २४/५/२०१३ अन्वये गठित उच्चस्तर धोरण समितीच्या बैठकीत संदर्भ क्र. ३ अन्वये मान्यता दिली आहे. संदर्भ क्र. ३ येथील शासनपत्र दिनांक २९/१/२०२४ अन्वये कळविले आहे. त्यानुसार सदर क्रीडा संकुलातील टेबल टेनिस हॉल मधील वुडन फ्लोअरींग बदलण्याच्या कामास व त्यासाठी अपेक्षित रु ३,३५,६७,५६४/-च्या खर्चास संदर्भ क्र .५ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे क्रीडा संकुलासाठीच्या सन २०२३-२४ मध्ये अर्थसंकल्पीय तरतूदीमधून या कामासाठीच्या खर्चासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

श्री शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे येथे टेबल टेनिस हॉल मधिल "वुडन फ्लोअरींग" बदलण्याच्या कामास व त्यासाठीच्या खर्चास संदर्भ क्र.५ येथील दिनांक १२/२/२०२४रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिली आहे. शिवछत्रपती क्रीडा संकुलासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात लेखाशिर्ष २२०४-१७०२ अंतर्गत ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली रु. ५३९०.०० लक्ष इतकी निधी अर्थसंकल्पित केला

आहे. शिवछत्रपती क्रीडा संकुलातील जुन्या क्रीडा सुविधांचे नुतनीकरण व अद्ययावतीकरणासाठी माहे जुलै, २०२३ च्या पावसाळी अधिवेशनात रु.३४०९.०० लक्षची पूरवणी मागणी मंजूर झाली असून त्यामुळे एकूण तरतूद रु.८७९९.०० लक्ष इतकी झालेली आहे. या तरतूदीमधून सदर खर्चासाठी रु. रु.२,८५,६७,५३४/-(रू.दोन कोटी पंच्याऐंशी लक्ष सदुसष्ट हजार पाचशे चौतीस फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार व मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्र.ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) (०१) क्रीडा संकुलांची स्थापना (२२०४ १७०२), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखालील या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

४. वित्त विभागाच्या दि. १२.४.२०२३ आणि दि.५.२.२०२४ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा यांना आंहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौ.संदर्भ क्र.१५५/१४७१, दि.१४/३/२०२४ व वित्त विभागाचा अनौ.संदर्भ क्र.४१०/व्यय-५, दि.२०/३/२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२८१२५०५७२३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING
ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2024.03.28 13:02:37 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन,मुंबई.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे खाजगी सचिव,
४. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेता,विधानसभा / विधानपरिषद, यांचे स्वीय सहायक, मुंबई

७. सर्व मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
८. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
९. मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव,
१०.मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव,
११.मा.मंत्री (क्रीडा) यांचे खाजगी सचिव,
१२.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,
१३.अपर मुख्य सचिव (वित्त/क्रीडा-अ.का) यांचे स्वीय सहाय्यक,
१४.महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
१५.उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे.
१६.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१७.कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. कार्यासन १४७१(नियोजन विभाग)
१९.कार्यासन व्यय ५(वित्त विभाग)
२०.निवड नस्ती (क्रीयुसे-१).